**टंचाई अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या उपाययोजनांच्या आवश्यकतेबाबत फेर आढावा .**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टंचाई-२०२०/प्र.क्र. ९९ /पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः ३० जून, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि., क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.

प्रस्तावना -

राज्यात बहुतांशी वर्षी अपुऱ्या पर्जन्यमानामुळे किंवा अन्य कारणामुळे ग्रामीण/नागरी क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण होत असते. शासनाने पिण्याच्या पाण्याची टंचाई निवारणार्थ ग्रामीण/ नागरी क्षेत्रात घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता वेळोवेळी स्थायी आदेशाद्वारे सविस्तर सूचना दिलेल्या आहेत. संदर्भात दिनांक ३ फेब्रुवारी १९९९ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याची टंचाई निवारणार्थ करावयाच्या उपाययोजनांबाबत कार्यवाही निश्चित करण्यात आलेली आहे सदर स्थायी आदेशानुसार पाणीटंचाई निवारणार्थ घेणाऱ्या उपाययोजना दिनांक ३० जूनपर्यंत राबविणे आवश्यक आहे. महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम २००९ मधील तरतुदीनुसार पिण्याच्या पाण्याची टंचाई भासल्यास कोणत्याही वेळी पिण्याच्या पाण्याची टंचाई जाहीर करून त्यांचा अंतर्गत घेण्यात येणाऱ्या उपाययोजना मधील उपयुक्त टंचाई निवारण पहिला घेण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना आहेत. राज्यात सुरू असणाऱ्या टँकर बाबत फेरआढावा घेऊन आवश्यक तिथेच टँकर सुरू ठेवण्याबाबतची कार्यवाही होणे अपेक्षित आहे. सबब, कालौघात चालू वर्षी टंचाई अंतर्गत करण्यात येत असलेल्या उपाययोजना आवश्यकता नसतानाही सुरू राहू नयेत, याकरिता आढावा घेण्याच्या सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

दिनांक ३० जून २०२० नंतर टंचाई अंतर्गत पिण्याच्या पाण्याच्या उपाययोजना सुरु ठेवायच्या असल्यास त्यासाठी जिल्हाधिकारी यांनी टंचाई परिस्थितीचा आढावा घेऊनच महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम २००९ मधील तरतुदीनुसार पिण्याच्या पाण्याची टंचाई असलेल्या क्षेत्रांमध्ये

पाणी टंचाई जाहीर करून टंचाई अंतर्गत घेण्यात येणाऱ्या उपाययोजना सुरू ठेवायच्या किंवा नाही याचा निर्णय त्यांच्या स्तरावर घेण्यात यावा. पाण्याची उपलब्धता विचारात घेऊन शक्य तितक्या लवकर खाजगी टॅंकर बंद करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

विभागीय आयुक्त यांनी दिनांक २ जुलै,२०२० पूर्वी याबाबतचा सर्वंकष आढावा घ्यावा व अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६३०१६०५२५४३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.06.30 16:34:29 +05'30'

**( गणेश पवार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
६. सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
१०.विभागीय आयुक्त (सर्व)
११.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर
१२.जिल्हाधिकारी (सर्व)/उपविभागीय अधिकारी (सर्व)
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१४.अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

१५.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१६.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१७.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व)
१८. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
१९.महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
२०.जिल्हा स्थानिक निधी लेखा परीक्षक (सर्व)
२१.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२२.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
२३.सह सचिव (पापु १४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
२४.पापु १४ (निवडनस्ती)